सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात राज्यातील महानगरपालिकांना संगणकीकरणासाठी अनुदान वितरीत करण्यासाठी.

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः** ईगव-२०१३/प्र.क्र.११९(१)/नवि-३३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २१ जानेवारी, २०१५

**वाचा -**

०१.शासन निर्णय क्र-पीएमसी-१००७/५४/प्र.क्र.२/नवि-३३,दि.२८ जुलै,२००९
०२.नगरपरिषद प्रशासन संचालनालयाचे पत्र क्र-नपप्रस२०१०/संगणकीकरण अनुदान/ प्र.क्र.१/८,दि२१/०५/२०१४

**प्रस्तावना -**

कल्याण डोंबिवली महानगरपालिकेने विकसित केलेली संगणक आज्ञावली राज्यातील इतर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये राबविण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे.त्यानुसार कल्याण डोंबिवली महानगरपालिकेने विकसित केलेल्या आज्ञावलीचे हक्क शासनाने घेतले असून त्याबदलात कल्याण डोंबिवली महानगरपालिकेस रु.२.०० कोटी अनुदान दिले आहे.सदर प्रकल्पाद्वारे राज्यातील सर्व नागरी स्थानिक संस्थांमधील ई-प्रशासनामध्ये समानता येणार असून प्रत्येक नागरी स्वराज्य संस्थांना संगणकीकरणाकरिता वेगळे प्रयत्न करावे लागणार नाही.कल्याण डोंबिवली महानगरपालिकेने विकसित केलेल्या संगणक प्रणालीची अंमलबजावणी करण्यासाठी वित्तिय आकृतीबंधास संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये तत्वत: मान्यता देण्यात आली आहे.

०२. सदर प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी शासनाने आयुक्त,कल्याण डोंबिवली महानगरपालिका यांची 'प्रकल्प व्यवस्थापक सल्लागार' म्हणून नियुक्ती केलेली आहे.सदर प्रकल्पासाठी संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने निधी वितरीत करण्याबाबत विनंती केलेली आहे.त्यानुसार सदर प्रकल्पासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.त्याअनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय -**

आयुक्त तथा संचालक,नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांच्या संदर्भाधीन क्रमांक २ येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने कल्याण डोंबिवली महानगरपालिकेने विकसित केलेली संगणक आज्ञावली राज्यातील इतर महानगरपालिकांमध्ये राबविण्यासाठी तसेच प्रकल्पातील सुरु असलेल्या कामांची देयके देण्याकरिता रुपये १,०९,४४,०००/-(रुपये एक कोटी नउ लक्ष चव्वेचाळीस हजार मात्र) इतकी रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.सदर रकमेचे वितरण अनुदान म्हणून करण्यात येत आहे.

०२. यासाठी आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व सहायक संचालक नगरपरिषद प्रशासन

संचालनालय, वरळी, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सहायक संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी सदर अनुदान रुपये १,०९,४४,०००/-(रुपये एक कोटी नउ लक्ष चव्वेचाळीस हजार मात्र) इतक्या रक्कमेचा धनादेश आयुक्त, तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय (Commissionerand Director, Directorate of Municipal Administration,Worli, Mumbai) या नावे काढून तो आयुक्त, तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांच्याकडे सुपूर्द करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल  शासनास सादर करावा.

**०३.** आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी आयुक्त,कल्याण डोंबिवली महानगरपालिका तथा प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यांच्याकडून प्राप्त देयकांच्या प्रस्तावाची छाननी करुन त्यानुसार देयके अदा करण्याची कार्यवाही करावी.

**०४.** आयुक्त तथा संचालक,नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई यांनी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था त्यांच्या हिश्याचा निधी खर्च करत आहेत,याची खात्री करावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

**०५.** कल्याण डोंबिवली महानगरपालिकेने विकसित केलेली संगणक आज्ञावली राज्यातील इतर महानगरपालिकांमध्ये राबविण्यासाठी देण्यात येणाऱ्या अनुदान रुपये रुपये १,०९,४४,०००/-(रुपये एक कोटी नउ लक्ष चव्वेचाळीस हजार मात्र) इतक्या रक्कमेचा खर्च हा नगर विकास विभाग-मागणी क्रमांक एफ-२,२२१७, नगर विकास,१९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (६९) राज्यातील महानगरपालिकांना संगणकीकरणासाठी अनुदान(२२१७८१०१),३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर), या लेखशिर्षामधून सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०६.** सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७१९/व्यय-३, दि. २९/११/२०१४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२७१५२२४७५६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

Jayasingrao Nanasaheb Patil

Digitally signed by Jayasingrao Nanasaheb Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao Nanasaheb Patil
Date: 2015.01.27 16:10:40 +05'30'

**ज.ना.पाटील**
**उप सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-२, नागपूर.

३. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पू.), मुंबई.

४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.

७. विशेष कार्य अधिकारी तथा नोडल एजन्सी फॉर जे.एन.एन.यु.आर.एम. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुबई ५१.

८. उप सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.

१०.निवडनस्ती, नवि-३३